महाराष्ट्र माहितीचा अधिकार अधिनियम-२००२

शासकीय माहिती अधिकारी व अपिलीय अधिकारीबाबत निर्देशित करणेबाबत...

2004071915370 3001-2500

महाराष्ट्र शासन
महिला व बाल विकास विभाग,
शासन आदेश क्र.ममाअ-२००३/प्र.क्र.८/का-९
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक :- २२ सप्टेंबर, २००३.

वाचा :- आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे याचे आस्था /१२००/ममाअधी/ का-१/२६२, दि.३१.१.२००३ चे पत्र.

## आदेश

महाराष्ट्र माहितीचा अधिकार अधिनियम, २००२ ची अंमलबजावणी दि.२३.९.२००२ पासून पूर्वलक्षी प्रभावाने झालेली आहे. शासनाच्या कारभारात पारदर्शकता आणण्यासाठी व जबाबदार प्रशासन तयार करण्यासाठी शासन कारभाराची जनतेस जास्त माहिती मिळावी यासाठी सदर अधिनियमाची अंमलबजावणी करण्याकरीता सामान्य प्रशासन विभाग शासन परिपत्रक क्र. ममाअ-२००२/ प्र.क्र.१२७/ ०२१५, दि.१४.८.२००३ अन्वये आदेश दिले आहेत. यानुसार प्रशासकीय विभाग व विभागीय कार्यालये, महामंडळे, मंडळे, बोर्ड, इत्यादींनी प्रभावीपणे कार्यवाही करावयाची आहे.

२. सदर अधिनिमाच्या कलम २(१), २(३) आणि ५ अन्वये जनतेला माहिती देण्याकरीता **शासकीय माहिती अधिकारी** व **अपिलीय अधिकारी** निर्देशित करावयाचे आहेत.

३. या विभागाच्या अखत्यातील कार्यरत असलेले महिला आर्थिक विकास महामंडळ, महाराष्ट्र राज्य समाज कल्याण सल्लागर बोर्ड व महाराष्ट्र राज्य महिला आयोग ही प्राधिकरणे सदर अधिनियमाच्या कलम २(३) अन्वये **सक्षम प्राधिकारी** आहेत. त्यामुळे त्यांनी सदर अधिनियमाच्या तरतूदीच्या अनुषंगाने **शासकीय माहिती अधिकारी** व **अपीलीय अधिकारी** यांच्या नेमणूकीबाबत त्वरित कार्यवाही करावी.

४. या विभागाअंतर्गत कार्यरत असलेले आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे व त्यांच्या अखत्यारित कार्यरत असलेली जिल्हा स्तरावरील कार्यालये,

त्याचप्रमाणे आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई व त्यांच्या अखत्यारित असलेली प्रकल्प स्तरावरील कार्यालये यामध्ये सदर कायद्याच्या अंमलबजावणीच्या अनुषंगाने **शासकीय माहिती अधिकारी व अपिलीय अधिकारी** यांच्या नेमणूकीबाबत शासन खालील नियुक्ती करीत आहे.

| अ.क्र | स्तर | शासकीय माहिती अधिकारी | अपिलीय अधिकारी |
|---|---|---|---|
| १. | मंत्रालय स्तर | अवर सचिव | उप सचिव |
| २. | आयुक्तालय स्तर | १. सह आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे<br>२. सह आयुक्त, एकात्मिक बाल विकास, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई.<br>३. उप आयुक्त (प्रशासन) महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे.<br>४. उप आयुक्त, एकात्मिक बाल विकास योजना आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई. | आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे<br>आयुक्त, एकात्मिक बाल विकास, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई.<br>आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.<br>आयुक्त, एकात्मिक बाल विकास योजना आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई. |
| ३. | जिल्हा स्तर | १. जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी.<br>२. उप मुख्य कार्यकारी अधिकारी (बाल कल्याण) जिल्हा परिषद. | आयुक्त महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे.<br>आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई |
| ४. | प्रकल्प स्तर | १. बाल विकास प्रकल्प अधिकारी (ग्रामीण)<br>२. बाल विकास प्रकल्प अधिकारी (नागरी) | १. उप मुख्य कार्यकारी अधिकारी (बाल कल्याण) जिल्हा परिषद<br>२. आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई. |

५. तसेच सर्व संबंधितांनी, कार्यालयातील अभिलेख तालिकाबध्द व निर्देशसुचीबध्द करण्याची कार्यवाही पूर्ण झाली नसल्यास तात्काळ पूर्ण करावी.

६. राज्यशासनाच्या माहितीच्या अधिकाराचा / अध्यादेश / अधिनियमाची अंमलबजावणी तो अंमलात नसल्याने आस्थगित आहे. असे असले तरी ही अधिनियम पूर्वलक्षी प्रभावाने म्हणजेच दि.२३ सप्टेंबर २००२ पासून लागू करण्यात आला असल्याने दरम्यानच्या कालावधीमध्ये माहितीची मागणी करणारे जे अर्ज प्रलंबित / अनिर्णित राहीले असतील त्या अर्जांवर कार्यवाही करणे आवश्यक ठरेल. मात्र कोणतीही दंडात्मक कारवाई पूर्वलक्षी

प्रभावाने करता येत नसल्याने या अधिनियमातील / नियमातील दंडात्मक तरतूदी या अधिनियमाच्या तारखेपासूनच लागू होतील.

७. सर्व शासकीय माहिती अधिकारी यांनी महाराष्ट्र माहितीचा अधिका अधिनियम-२००२ याचे काटेकोरपणे पालन करावे. या विभागातील सर्व अधिकारी / कर्मचारी यांची विभागाचे शासकीय माहिती अधिकारी यांना वेळोवेळी योग्य ती माहिती देण्याची दक्षता घ्यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

२२/१२/२००३

(य. रा. गायकवाड)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,
राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
मुख्यमंत्र्यांचे सचिवालय, मंत्रालय, मुंबई
उपमुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई.
सर्व मंत्री, यांचे खाजगी सचिव.
सर्व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई.
प्रबंधक, उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई
प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोकआयुक्त यांचे कार्यालय, मुंबई.
सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई.
सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधानसभा), मुंबई/ नागपूर.
सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधानपरिषद), मुंबई/ नागपूर.
राज्य निवडणूक आयुक्त, नवी प्रशासन भवन, मुंबई.
शासनाचे सर्व अप्पर मुख्य सचिव / प्रधान सचिव/ सचिव, मंत्रालय, मुंबई
सर्व मंत्रालयीन विभाग.
आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, रायगड भवन, नवी मुंबई.
व्यवस्थापकीय संचालक, महिला आर्थिक विकास महामंडळ, बांद्रा,मुंबई.
सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य महिला आयोग, बांद्रा, मुंबई.
सचिव, महाराष्ट्र राज्य समाज कल्याण सल्लागार बोर्ड, मुंबई.
सचिव, महिला व बाल विकास विभाग यांचे स्वीय सहाय्यक.
महिला व बाल विकास विभागातील सर्व अधिकारी.
निवड नस्ती, का-९.